**ग्राहक किंमती निर्देशाक (पायाभूत वर्ष-२०१८) या नवीन मालिकेकरीता अंशकालीन भावसंकलकांची नियुक्ती करण्याबाबत व मानधन निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१८५/का.१४२६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ३१ ऑगस्ट, २०२०

**संदर्भ** :-१) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.अवि/पाव/ रातांसस/ २०१८/२९५, दिनांक १/११/२०१८.
२) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.अवि/पाव/रातांसस/ २०१८/०४, दिनांक ३/१/२०१९.
३) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.अवि/पाव/रातांसस/ २०१८/६९, दिनांक २७/३/२०१९.
४) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.असांस/अवि/०३१९/ ग्राकिंनि / पावब/भासंमा/२८९, दिनांक २३/१२/२०१९.

**प्रस्तावना :-**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने संदर्भाधिन क्र. १ ते ४ येथील पत्रांद्वारे केलेल्या विनंतीनुसार, ग्राहक किंमती निर्देशांक (पायाभूत वर्ष २०१८) या नवीन मालिकेकरीता अंशकालीन भावसंकलकांची नियुक्ती करण्याची व मानधन निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या पार्श्वभूमीवर पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

(अ) अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत परिगणित करण्यात येणाऱ्या ग्राहक किंमती निर्देशांक (पायाभूत वर्ष २०१८) या नवीन मालिकेकरीता अंशकालीन भावसंकलकांचे मानधन प्रतिबाजारपेठ “अ” वर्ग शहरांकरीता रुपये ३,५००/- (प्रवासभत्त्यासहित), “ब” वर्ग शहरांकरीता रुपये ३,२००/- (प्रवासभत्त्यासहित) आणि “क” वर्ग शहरांकरीता रुपये २,७५०/- (प्रवासभत्त्यासहित) इतके करण्यास मान्यता देण्यात येत आहे. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ४/५/२०२० मधील तरतुदींस अनुसरुन मानधनाचे सुधारीत दर दिनांक १/९/२०२० पासून लागू होतील. या मानधनापैकी रुपये ५००/- प्रतिमाह इतकी रक्कम ग्राहक किंमती निर्देशांक (पायाभूत वर्ष २०१८) या नवीन मालिकेकरीता माहिती गुणवत्तापूर्ण व विहित वेळेत सादर करणे, यासाठी संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई

यांच्याकडून निश्चित करण्यात येणारे निकष पूर्ण करणारे अंशकालीन भावसंकलक यांना वित्तीय वर्षाच्या अखेरीस एकत्रितरीत्या अदा केली जाईल. ही रक्कम खाली नमूद प्रादेशिक स्तरीय समितीने घेतलेल्या निर्णयानुसार अदा करण्यात यावी.

(ब) अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत परिगणित करण्यात येणाऱ्या ग्राहक किंमती निर्देशांक (पायाभूत वर्ष-२०१८) या नवीन मालिकेकरीता नागरी भागांतील “अ” वर्ग शहरांतील ९१ बाजारपेठा, “ब” वर्ग शहरांतील ४२ बाजारपेठा व “क” वर्ग शहरांतील १५२ बाजारपेठा आणि ग्रामीण भागातील “क” वर्ग शहरांतील २०६ बाजारपेठा अशा एकूण ४९१ बाजारपेठांकरीता प्रत्येकी १ याप्रमाणे कमाल एकूण ४९१ अंशकालीन भावसंकलकांची नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(क) अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत परिगणित करण्यात येणाऱ्या ग्राहक किंमती निर्देशांक (पायाभूत वर्ष-२०१८) या नवीन मालिकेकरीता अंशकालीन भावसंकलनाचे काम करण्याकरीता येणारा वार्षिक खर्च “मागणी क्र. ओ-९, ३४५४ गणना सर्वेक्षण व सांख्यिकी, ०२ सर्वेक्षण व सांख्यिकी, ११२ आर्थिक सल्ला व सांख्यिकी, (०२) (०१) मूलभूत आकडेवारी गोळा करणे (योजनेतर) (३४५४ ००८२), २८-व्यावसायिक सेवा” या लेखाशिर्षाखाली त्या-त्या वर्षी उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत भावसंकलन केंद्रासाठी अंशकालीन भावसंकलक यांची आवश्यकतेप्रमाणे नियुक्तीचे अधिकार खालील प्रादेशिकस्तरीय समितीस राहतील :-

| | |
|---|---|
| (१) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय | अध्यक्ष |
| (२) उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय | सदस्य |
| (३) जिल्हा सांख्यिकी अधिकारी (संबंधित) | सदस्य सचिव |

**सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय यांच्या अध्यक्षतेखाली स्थापित प्रादेशिक समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे असेल :-**

(अ) भावसंकलन केंद्रासाठी जर अंशकालीन भावसंकलक नेमले गेले नाहीत अथवा कार्यरत नाहीत त्या ठिकाणी अंशकालीन भावसंकलकांची नियुक्ती करण्याबाबतचा प्रस्ताव “सदस्य सचिव” तयार करुन प्रादेशिक समितीकडे सादर

करतील. प्रादेशिक समितीच्या मान्यतेने अंशकालीन भावसकंलकांच्या नियुक्तीबाबतचे आदेश संबंधित जिल्हा सांख्यिकी अधिकारी निर्गमित करतील.

(आ) भावसंकलन केंद्रांकरीता नियुक्त अंशकालीन भावंसकलकांनी जिल्हा सांख्यिकी अधिकारी यांच्याकडे दरमहा सादर केलेली माहिती गुणवत्तापूर्ण आहे किंवा कसे, व माहिती वेळेत सादर केलेली आहे किंवा कसे, याबाबत जिल्हा सांख्यिकी अधिकारी यांनी त्यांचे मूल्यमापन प्रादेशिक समितीकडे परिक्षणासाठी सादर करावे. सदर परिक्षण हे प्रत्येक आर्थिक वर्षात १ एप्रिल ते ३१ मार्च या कालावधीसाठी पूर्ण करण्यात यावे व अंशकालीन भावसकंलकांना मानधनातील राखीव रुपये ५००/- प्रतिमाह इतकी रक्कम पुढील आर्थिक वर्षात ३० एप्रिल पूर्वी निधी उपलब्धतेनुसार देण्याबाबत निर्णय घ्यावा.

३. वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र.८६/९/३/२०२०, दिनांक ८/६/२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८३११७१११०८३१६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRADNYA
MAHALE

Digitally signed by PRADNYA MAHALE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657
ea855ac85f31e5f681e, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=f0b9244e8f45f12e0a399cd036d6d3767c67c834
9951e3e5047b7469a24cdfb2, ou=PLANNING DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRADNYA MAHALE
Date: 2020.09.04 16:49:30 +05'30'

**( प्रज्ञा महाले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा. संसद सदस्य (सर्व).
६) मा. विधानपरिषद सदस्य (सर्व).
७) मा. विधानसभा सदस्य (सर्व).
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग (सर्व), मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

१२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी, वित्त विभाग, व्यय-८ / आ.पु.क., मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१७) निवडनस्ती.

*****